सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) लेखाशीर्षांतर्गत लेखानुदान वितरण करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१७/प्र.क्र.५४/फ-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : १५ एप्रिल, २०१७**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क. ६८/अर्थ-३, दि. ०१.०४.२०१७.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र: बीयुडी-२०१७/२४०६/प्र.क्र. ९१/ब-१, दि. ०१.०४.२०१७.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे, यांचे पत्र क्र.कक्ष-१/अनुदान/प्र.क्र.०७/१७-१८, दि.१०.०४.२०१७.

**प्रस्तावना :-**

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५)"** या योजनेंतर्गत सन २०१७-२०१८ करिता रु.२६००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या योजनेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात लेखानुदान करीता रु. ४३३.०० लक्ष इतका निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१७-१८ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५)"** या योजनेकरिता रु.२६००.०० लक्ष इतका निधी मार्च, २०१७ मधील अर्थसंकल्पीय अधिवेशनात अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे एप्रिल, २०१७ ते मे, २०१७ अखेर या दोन महिन्यांकरीता रु. ४३३.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. **विवरणपत्र-१** प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास प्रधान मुख्य वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

५. **सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.**

**"मागणी क्र.सी-७, वनीकरण व वन्यजीवन, राज्य योजनांतर्गत योजना, ८००-५०-इतर खर्च-(०२) (०६) इको-टूरीझम (राज्य) (२४०६ २२९५) स्व.उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती".**

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ६८/अर्थ-३, दि. १.०४.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१५१६१३११९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2017.04.15 16:15:04 +05'30'

**( विजय खेडेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
५. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी, मुंबई
१०. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.

<u>विवरणपत्र -१</u>

**शासन निर्णय क्र.साववि-२०१७/प्र.क्र.५४/फ-११, दि. १५.०४.२०१७**

**योजनेचे नावः- "स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती" मुख्यलेखाशीर्ष :- (२४०६ २२९५)**

**(रु. लाखात)**

| सविस्तर लेखाशीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | एप्रिल, २०१७ | मे, २०१७ | एकूण |
|---|---|---|---|---|
| "मागणी क्र.सी-७, वनीकरण व वन्यजीवन, राज्य योजनांतर्गत योजना, ८००-५०-इतर खर्च-(०२) (०६) इको- टूरीझम (राज्य) (२४०६ २२९५) स्व.उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती." | ४३३.०० | २३३.०० | २००.०० | ४३३.०० |

Vijay Ramchandra Khedekar

Digitally signed by Vijay Ramchandra Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Ramchandra Khedekar
Date: 2017.04.15 16:15:38 +05'30'

( विजय खेडेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन